**महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०२०/प्र.क्र.१६/२०२०/आस्था-३ (अ)**

मंत्रालय, बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४००, ००१.

तारीख:- २० मार्च,२०२०.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने तसेच उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदींनुसार खालील अधिकाऱ्याच्या बदलीचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्याची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| **नागपूर विभाग** | | | |
| १. | श्री.प्रशांत मोहोड, सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती कारंजा,जिल्हा परिषद वर्धा | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती नरखेड, जिल्हा परिषद, नागपूर | रिक्त पदी |

२. उपरोक्त नमूद अधिकाऱ्यानी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/ २५६७/२८/अकरा,दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्तांनी उपरोक्त अधिकाऱ्याला त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे. तसेच उपरोक्त अधिकाऱ्यानी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. संबंधित अधिकारी हा विहित कालावधीत नियुक्तीच्या पदावर रुजू न झाल्यास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००३२०११४२०९५३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PANDIT KAHANDE RAO JADHAV

Digitally signed by PANDIT KAHANDERAO JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f5c40942371a6969108d4d7e802129ea5f7a19f482726930e17fe1f06ad5cc76, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PANDIT KAHANDERAO JADHAV
Date: 2020.03.20 16:29:36 +05'30'

(पं.खं.जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

१. मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव.
३. मा. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
४. विभागीय आयुक्त,नागपूर.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा व नागपूर.
६.महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७.संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद).
८.कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग.
९. निवड नस्ती (कार्यासन-आस्था-३अ).